**फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम २५(३) अन्वये तात्पुरत्या स्वरुपात कार्यरत विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांच्या मानधनात वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. डीपीपी-०९२१/प्र.क्र.२०३/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०६ एप्रिल, २०२३

**संदर्भ** :-**१)** शासन पत्र, गृह विभाग क्र.एसपीपी-१०१९/प्र.क्र.९८/पोल-१०, दिनांक २१.०८.१९९९.

**२)** शासन निर्णय क्र.एसपीपी-२००७/२०८३/प्र.क्र.१९९/पोल-१०, दिनांक ०८.१२.२००९.

**३)** शासन निर्णय क्र.डीपीपी-२०१२/प्र.क्र.११७/पोल-१०, दि.१५.०७.२०१३.

**४)** संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. विसअने/ १२९/ १३४६/२०२१, दि.२७.०८.२०२१, दि.२७.०८.२०२१.

**प्रस्तावना :-**

फौजदारी प्रक्रिया संहिता कलम २५ (३) अन्वये मा. प्रथमवर्ग न्यायदंडाधिकारी न्यायालयात नियमित सहाय्यक सरकारी अभियोक्ता उपलब्ध नसेल तेथे संबंधित जिल्हादंडाधिकाऱ्यांमार्फत विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्ता म्हणून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येते. अशाप्रकारे नियुक्त करण्यात येणाऱ्या विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांना संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक १५.०७.२०१३ अन्वये अदा करावयाचे मानधनाचे दर निश्चित करण्यात आले आहेत. तथापि, मानधनाचे दर सन २०१३ मध्ये निश्चित करण्यात आले असल्याने, विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांच्या फी / मानधनात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

फौजदारी प्रक्रिया संहिता कलम २५ (३) अन्वये तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त विशेष सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांना शासन निर्णय क्र.डीपीपी-२०१२/प्र.क्र.११७/पोल-१० दि.१५.०७.२०१३ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या मानधनात खालीलप्रमाणे वाढ मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| | बाब | सध्याचे मानधन | सुधारित मानधन |
|---|---|---|---|
| अ) | प्रतिदिन परिणामकारक सुनावणीसाठी फी | रु.६००/- | रु.१२००/- |
| ब) | एका जामीन अर्जाच्या विरोधाकरीता | रु.४००/- | रु.८००/- |
| क) | प्रतिदिन एकूण कमाल मर्यादा | रु.१०००/- | रु.२०००/- |

**२. एकापेक्षा जास्त सुनावणी किंवा जामीन अर्जाच्या विरोधाचे काम चालविले तरी प्रतिदिन कमाल मर्यादा रु.२०००/- राहिल.**

**३.** उपरोक्त सुधारीत फी / मानधनाचे दर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होतील.

४. यावरील खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक बी-१, न्यायादान (००) (११४) विधी सल्लागार व समुपदेशी (००) (०१) संचालक सरकारी अभियोग (२०१४००२९) १०-कंत्राटी सेवा या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारित संदर्भ क्र.४९६/२०२२/व्यय-७, दि.२२.११.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१०१२३३१०३२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.04.10 12:39:36 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मुंबई
९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०. सर्व प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश
११. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. सर्व उपसंचालक, सरकारी अभियोग, कोकण परिक्षेत्र, मुंबई / पुणे परिक्षेत्र, पुणे / नाशिक परिक्षेत्र, नाशिक / औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद / अमरावती परिक्षेत्र, अमरावती / नागपूर परिक्षेत्र, नागपूर
१३. सर्व सहाय्यक संचालक व सरकारी अभियोक्ता, मुंबई / ठाणे / रायगड / रत्नागिरी / सिंधुदूर्ग / नाशिक / धुळे / नंदूरबार / जळगांव / अहमदनगर / पुणे / सातारा / सांगली / सोलापूर /कोल्हापूर / औरंगाबाद / जालना / परभणी / हिंगोली / बीड / नांदेड / उस्मानाबाद / लातूर / अमरावती / यवतमाळ / बुलढाणा / अकोला / वाशिम / नागपूर / भंडारा / गोंदिया / चंद्रपूर / गडचिरोली / वर्धा.
१४. सर्व जिल्हाधिकारी,
१५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१६. निवडनस्ती. (पोल-१०)